**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**क्रमांकः प्रतिनि-२०१६/१०१९/प्र.क्र.१८१/१६/चौदा**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १९.११.२०१६

## आदेश

श्री.कि.व.वाहुल, उप सचिव, नियोजन विभाग यांची सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत राज्य कामगार विमा योजना,मुंबई या कार्यालयांतर्गत संचालक (प्रशासन) या पदावर प्रथमत: दोन वर्षाच्या कालावधीकरीता प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यासाठी त्यांच्या सेवा खालील अटींच्या अधीन सुपूर्द करण्यात येत आहेत :-

(अ) श्री.कि.व.वाहुल, उप सचिव, ज्या तारखेला शासकीय सेवेतील पदाचा कार्यभार सुपूर्द करतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला श्री.वाहुल, उप सचिव आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारतील, त्या तारखेला समाप्त होईल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीला शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील.

(क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्याला मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र, याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी ३ महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा.....इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट-२) मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती विचारात घेऊन, प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती नियोजन विभाग व सार्वजनिक आरोग्य विभाग यांनी आपापसात सल्लामसलत करुन ठरवाव्यात.

३. श्री.कि.व.वाहुल, उप सचिव यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी नियोजन विभाग यांचेमार्फत हाताळण्यात येतील.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून, त्यांचा संगणक सांकेतांक २०१६१११९१४५५४९१९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2016.11.19 14:57:46 +05'30'

**( इ.मु.काझी )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. प्रधान सचिव (सेवा),सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई,
४. अ.मु.स./प्र.स./सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. अ.मु.स./प्र.स./सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग,जी.टी.रुग्णालय संकुल, नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
६. संचालक, राज्य कामगार विमा योजना,
७. सह/उप सचिव (आस्थापना), नियोजन विभाग/सार्वजनिक आरोग्य विभाग,
८. श्री.कि.व.वाहुल, उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. निवडनस्ती कार्यासन-१४.